**जागतिक महिला दिनानिमित्त बृहन्मुंबई शासकीय कार्यालयांतील महिला कर्मचाऱ्यांच्या मेळाव्यास उपस्थित राहण्यास परवानगी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: संकीर्ण ३६२५/प्र.क्र.२६/रवका-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ११ मार्च, २०२५.

**शासन परिपत्रक:-**

जागतिक महिला दिनानिमित्त बृहन्मुंबई राज्य सरकारी कर्मचारी संघटना, मुंबई यांच्यातर्फे बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयांतील महिला कर्मचा-यांसाठी बुधवार, दिनांक १२ मार्च, २०२५ रोजी आरोग्य भवन सभागृह, सेंट जॉर्ज रुग्णालय आवार, मुंबई येथे दुपारी २.०० वाजता मेळाव्याचे आयोजन करण्यात आले आहे.

२. त्यानुसार बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयांतील महिला कर्मचा-यांना वरील कार्यक्रमासाठी उपस्थित राहता यावे, यासाठी त्यांना बुधवार, दिनांक १२ मार्च, २०२५ रोजी दुपारी २.०० वाजता कार्यालय सोडण्याची अनुमती देण्यात येत आहे. सर्व मंत्रालयीन विभागांनी बृहन्मुंबईतील आपल्या आधिपत्याखालील कार्यालयांना त्याप्रमाणे कळविण्याची व्यवस्था करावी. तथापि, या महिला कर्मचा-यांनी सवलतीमुळे कार्यालयीन कामकाजाच्या वेळेत येणारी ४.१५ तासांची तूट पुढील आठवडयात भरून काढावी.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३१११४१६१६२२०७ असा आहे. डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by SHAHAJAHAN SHAKUR MULANI
Date: 2025.03.11 14:17:31 +05'30'

**(शहाजहान मुलाणी)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत-**
१. सर्व मंत्रालयीन विभाग.
२. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने.
३. निवड नस्ती.